राष्ट्रीय आरोग्य अभियान अंतर्गत जिल्हा दक्षता व संनियंत्रण समितीची पुनर्रचना.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

**शासन निर्णय क्रमांकः** साआवि-३००११/ ४१०/२०१४/आ-७
जी.टी. रुग्णालय आवार, १० वा मजला,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक: १७ मार्च , २०१५

**वाचा -:**

१) श्री.सी.के. मिश्रा अतिरिक्त सचिव, तथा अभियान संचालक एनएचएम, स्वास्थ्य एवं परिवार कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे दि १३ ऑगस्ट, २०१४ चे आदेश.
२) शासन निर्णय क्र. राग्राअ-२०१२/प्र. क्र. २६६/आ-७, दि. २८/३/२०१३
३) उपसंचालक, राग्राआअ -II, स्वास्थ्य एवं परिवार कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे दि . १०/९/ २०१४ रोजीचे निर्देश पत्र .

**प्रस्तावना -:**

संदर्भाधीन दि. २८/३/२०१४ च्या शासन निर्णयान्वये, ग्रामीण भागाचा विचार करुन राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानांतर्गत प्रत्येक जिल्हयात जिल्हा दक्षता व सनियंत्रण समिती गठीत करण्यात आली होती. महाराष्ट्रातील सुमारे ४५ % लोकसंख्या नागरी भागात वास्तव्यास असून त्यामानाने नागरी भागात आरोग्याशी संबंधित पायाभूत सोयीसुविधांची कमतरता आहे. ही कमतरता भरुन काढण्यासाठी केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचनांनुसार नागरी भागासाठी राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियान हा कार्यक्रम कार्यान्वित करण्यात आला आहे. राष्ट्रीय आरोग्य अभियान यामध्ये राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानाबरोबरच राष्ट्रीय नागरी आरोग्य अभियानाचा समावेश करण्यात आला आहे. त्यानुसार केंद्र शासनाने उपरोक्त दि. १३/८/२०१३ च्या आदेशान्वये दिलेल्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांनुसार ग्रामीण भागाबरोबरोच नागरी भागात राष्ट्रीय आरोग्य अभियान कार्यक्रमाची प्रभावी अंमलबजावणी करण्यासाठी जिल्हास्तरावर जिल्हा दक्षता व नियंत्रण समित्यांची पुनर्रचना करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या संदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय:-**

केंद्र शासनाच्या सुधारीत मार्गदर्शक सुचनांनुसार राष्ट्रीय आरोग्य अभियानाची अंमलबजावणी व लोकाधारीत सनियंत्रणासाठी गठीत केलेल्या जिल्हा दक्षता व सनियंत्रण समितीची पुढीलप्रमाणे पुनर्रचना करण्यात येत आहे. तसेच यासंदर्भातील दि. २८/३/२०१३ चा शासन निर्णय अधिक्रमित करण्यात येत आहे.

**जिल्हा दक्षता व सनियंत्रण समितीची रचना** :-

| | |
|---|---|
| १) जिल्हयातील ज्येष्ठ लोकसभा सदस्य | - अध्यक्ष |
| २) जिल्हयातील अन्य लोकसभा सदस्य (असल्यास) | - सह अध्यक्ष |
| ३) विधानसभा सदस्य (संबंधित जिल्हा) | - सदस्य |
| ४) सर्व महापौर/नगराध्यक्ष ( रानाआअ) | - सदस्य |
| ५) जिल्हाधिकारी | - सदस्य |
| ६) अध्यक्ष जिल्हा परिषद | - सदस्य |
| ७) आयुक्त (संबंधित महानगरपालिका ) | - सदस्य |
| ८) मुख्याधिकारी सर्व नगरपालिका व कटकमंडळे | - सदस्य |
| ९) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | - सदस्य |
| १०) सभापती, पंचायत समिती | - सदस्य |
| ११) कार्यकारी अभियंता, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, संबंधित जि.प. | - सदस्य |
| १२) जिल्हा शिक्षणाधिकारी | - सदस्य |
| १३) जिल्हा समाजकल्याण अधिकारी | - सदस्य |
| १४) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा | - सदस्य |
| १५) वैद्यकिय आरोग्य अधिकारी (सर्व महानगरपालिका) | - सदस्य |
| १६) जिल्हा आरोग्य अधिकारी, जि.प. | - सदस्य सचिव |

जिल्हा दक्षता व संनियंत्रण समितीच्या अध्यक्षांची नियुक्ती करतांना जिल्हा आरोग्य अधिकारी यांनी संबंधित जिल्हाधिकारी यांची मान्यता घ्यावी. सदर नियुक्ती करतांना केंद्र शासनाने खालील निर्देश दिले आहेत. त्यांची काटेकोरपणे अंमलबजावणी करावी.

१) ज्या जिल्हयामध्ये लोकसभेचे एकापेक्षा जास्त सदस्य असतील अशा जिल्हयांमध्ये जिल्हा दक्षता व नियंत्रण समितीचे अध्यक्ष निवडतांना, खालील क्रमाने ज्येष्ठता विचारात घ्यावी. लोकसभा अध्यक्ष, लोकसभा उपाध्यक्ष, केंद्रीय मंत्रीमंडळातील मंत्री, लोकसभेतील विरोधी पक्षनेता इ.

२) ज्या जिल्हयात लोकसभा सदस्य किंवा केंद्रीय मंत्री नसतील त्या जिल्हयात वरिष्ठ लोकसभा सदस्य समितीचे अध्यक्ष राहतील.

३) ज्या ठिकाणी दोन किंवा त्यापेक्षा जास्त लोकसभा सदस्य यांचा कार्यकाल समान असेल त्यावेळी त्या जिल्हयात ज्या लोकसभा सदस्यांचे कार्यक्षेत्र मोठे/जास्त असेल त्याची अध्यक्ष म्हणून नियुक्ती करावी.

४) ज्या जिल्हयात एकापेक्षा जास्त लोकसभा सदस्य असतील त्या ठिकाणी वरील निर्देशानूसार समितीचे अध्यक्ष निवडल्यानंतर उर्वरित लोकसभा सदस्य यांची सह अध्यक्ष म्हणून नियुक्ती करावी.

**जिल्हा दक्षता व नियंत्रण समितीची कामे:-.**

१) राष्ट्रीय आरोग्य अभियानांतर्गत जिल्हयाच्या आरोग्य कृती आराखडयाची अंमलबजावणी व प्रगती यांचा आढावा घेणे.

२) केंद्र शासनाने व राज्य शासनाने वितरीत केलेल्या अनुदानातून खर्चाचा आढावा घेणे.

३) जिल्हयातील क्षेत्रीय स्तरावर आरोग्य विषयक सुविधांना भेटी देणे, मनुष्यबळ व औषधांच्या उपलब्धतेची तपासणी करणे.

४) उपलब्ध यंत्रणेचा पुर्ण क्षमतेने व योग्यप्रकारे उपयोग होत आहे याची खात्री करणे.

५) ज्या बाबींसाठी इतर विभागाचा सहभाग आवश्यक आहे, त्या त्या ठिकाणी संबंधित विभागाचे व संस्थांचे सहकार्य घेणे व सशक्त सनियंत्रण करणे.

६) कार्यक्रमाची उदिद्ष्टये गाठण्याकरिता व जनतेस चांगल्या आरोग्य सुविधा पुरविण्यासाठी आवश्यक त्या उपाययोजना करणे.

७) कार्यक्रमाबाबत तक्रारीचा आढावा घेणे. त्रुटीच्या निमुर्लना योग्य कार्यपध्दती विकसीत करणे.

८) या समितीची तीन महिन्यांतून एकदा बैठक घेण्यात यावी. समितीने आपल्या कामकाजाचा त्रैमासिक अहवाल विवरणपत्र-अ प्रमाणे आयुक्त, कुटुंब कल्याण तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान यांना न चुकता सादर करावा. त्यांनी एकत्रित अहवाल केंद्र शासनास प्रत्येक तिमाहीनंतरच्या महिन्यात म्हणजेच ३१ जुलै/ आक्टोबर/ जानेवारी व ३० एप्रिल पूर्वी सादर करावा, त्याची प्रत राज्य शासनास पाठवावी.

सदर समिती शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत कार्यरत राहील .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३११११४५३५०७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manohar Sadhu Thombare

Digitally signed by Manohar Sadhu Thombare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manohar Sadhu Thombare
Date: 2015.03.17 11:06:58 +05'30'

**मनोहर ठोंबरे**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) मा. राज्यपाल यांचे सचिव
२) आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, आरोग्य भवन, मुंबई
४) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
५) जिल्हयातील सर्व लोकसभा सदस्य
६) विधानसभा सदस्य (सर्व)
७) महापौर/नगराध्यक्ष ( रानाआअ) (सर्व)
८) जिल्हाधिकारी (सर्व)
९) अध्यक्ष जिल्हा परिषद (सर्व)
१०) आयुक्त (सर्व महानगरपालिका )
११) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१२) मुख्याधिकारी सर्व नगरपालिका व कटकमंडळे
१३) सभापती, पंचायत समिती
१४) कार्यकारी अभियंता, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, जि.प.
१५) जिल्हा शिक्षणाधिकारी, सर्व जिल्हे
१६) जिल्हा समाजकल्याण अधिकारी, सर्व जिल्हे
१७) प्रकल्प संचालक, जिल्हा ग्रामीण विकास यंत्रणा, सर्व जिल्हे
१८) वैद्यकिय आरोग्य अधिकारी (सर्व महानगरपालिका)
१९) जिल्हा आरोग्य अधिकारी, जि.प. सर्व जिल्हे
२०) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव
२१) मा. मंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव

२२) मा. राज्यमंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव
२३) निवड नस्ती (आ ७)

विवरणपत्र -"अ"

Annexure- A

शासन निर्णय सा. आ. वि. क्र. ...................................................... चे जोडपत्र

State/District: Maharashtra DLVMC Quarterly report for ------ Quarter

**महाराष्ट्र - जिल्हा दक्षता व नियंत्रण समिती त्रैमासिक अहवाल.**

| Sr. No अक्र. | Name of District जिल्हयाचे नाव | Date of Meeting बैठकीचा दिनांक | Whether quarterly field visit undertaken (Y/N) त्रैमासिक क्षेत्रीय भेट दिली काय | Remarks/Any Special Observations of DLVMC अभिप्राय विशेष निरिक्षणे/ |
|---|---|---|---|---|
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |
| | | | | |